# महाराष्ट्र शासन

क्रमांक:- गौखनि-३५/०६२०/प्र.क्र.१५०/ख,

महसूल व वन विभाग, हुतात्मा राजगुरू चौक,
मादाम कामा मार्ग, मुंबई-४०० ०३२,
दिनांक :-२८ ऑगस्ट, २०२०.

विषय:- *गौण खनिज-सातारा*
सन २०११-१२ या वर्षाकरिता मौजे रेठरे(खु),ता.कराड, जि.सातारा या वाळूगटाची शासनजमा केलेली रक्कम व्याजासह परत करणेबाबत.
**श्री.पोपटराव व्यंकटराव पाटील.**

***शासन ज्ञापन :-***

जिल्हाधिकारी, सातारा यांना त्यांचे पत्र क्र.गौणखनिज/१/कावि/२५०/२०२०, दिनांक २९/०५/२०२० रोजीच्या उपरोक्त विषयाबाबतच्या पत्रास अनुलक्षून असे कळविण्याचे मला निदेश आहेत की, सन २०११-१२ मधील मौजे मौजे रेठरे(खु), ता.कराड, जि.सातारा हा वाळूगट सर्वोच्च बोली रु.५९,७५,०००/- एवढ्या रक्कमेस श्री. पोपट व्यंकटराव पाटील यांना मंजूर करण्यात आला. लिलावधारक यांनी लिलाव घेतलेनंतर लिलावाचे बोलीची रक्कम जमा केल्यानंतर प्रकरण आदेशाकरिता सादर करण्याकरिता उपविभागीय अधिकारी, कराड यांचेकडून समक्ष प्राप्त केले. परंतु अर्जदार यांनी प्रस्तुतचे मूळ प्रकरण जिल्हाधिकारी कार्यालयास सादर न करता स्वत: जवळ ठेवलेले आदेश देण्याची व त्यानुसार वाळूगटाचा ताबा देणेची कार्यवाही झाली नाही.

त्याअनुषंगाने लिलावधारक यांनी शासनजमा केलेली रक्कम परत करण्याची मागणी शासन पत्र दिनांक २५/०३/२०१४ अन्वये लिलावधारकाची विनंती अमान्य करण्यात आली.

तद्नंतर लिलावधारक श्री. पोपटराव व्यंकटराव पाटील यांनी त्याविरुध्द मा. मुंबई उच्च न्यायालय येथे रिट याचिका क्रमांक ८७०८/२०१७ दाखल केली. सदरील याचिका मा. मंबई उच्च न्यायालयाने दिनांक ०६/०८/२०१८ रोजी फेटाळली. त्याविरुध्द लिलावधारक श्री. पवार यांनी मा.सर्वोच्च न्यायालयात विशेष अनुमती याचिका क्रमांक ५२९०/२०१९ दाखल केली. सदरील याचिकेवर मा. सर्वोच्च न्यायालयाने दिनांक १४/०२/२०२० रोजी याचिकाकर्त्याने शासन जमा केलेली रक्कम ६% व्याजाने परत करण्याचे आदेश दिले आहेत. यास्तव लिलावधारक श्री. पोपटराव व्यंकटराव पाटील यांना त्यांनी शासन जमा केलेली सर्वोच्च बोलीची रक्कम रु.५९,७५,०००/-(अक्षरी रुपये एकोणसाठ लक्ष पंच्याहत्तर हजार फक्त) तसेच व्याजाची रक्कम रु.३१,१९,९४६/-(अक्षरी रुपये एकतीस लक्ष एकोणवीस हजार नऊशे शेहचाळीस फक्त) लिलावधारकास परत करण्याबाबतचा शासनाने निर्णय घेतला आहे.

०२. सबब, लिलावधारक श्री. पोपटराव व्यंकटराव पाटील यांना यांना त्यांनी शासन जमा केलेली सर्वोच्च बोलीची रक्कम रु.५९,७५,०००/-(अक्षरी एकोणसाठ लक्ष पंच्याहत्तर हजार रुपये फक्त) तसेच व्याजाची रक्कम रु.३१,१९,९४६/-(अक्षरी एकतीस लक्ष एकोणवीस हजार नऊशे शेहचाळीस रुपये फक्त) मा. सर्वोच्च न्यायालय यांच्या आदेशानुसार त्यांनी लिलावाची संपूर्ण रक्कम प्रत्यक्षात शासनाकडे जमा केल्याची, यापूर्वी ही रक्कम अदा केलेली नाही, याची खातरजमा करुन घेण्याच्या अटीवर अदा करण्यास या शासन ज्ञापनाद्वारे शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

०३. लिलावाच्या सर्वोच्च बोलीची रक्कम यावरील होणारा खर्च रु. ५९,७५,०००/- सन २०२०-२१ या वर्षाकरीता लेखाशीर्ष “०८५३- अलोहयुक्त खाणी व धातुशास्त्रीय उद्योग” १०२-खनिजबाबत सवलत फी व स्वामित्वधन,९००, अलोहयुक्त खाणकाम व धातुशास्त्रीय उद्योग- वजा परतावे (००)(०१) वजा परतावे (०८५३ ००८६) खाली उपलब्ध असलेल्या अंदाजपत्रकीय तरतूदीमधून खर्ची टाकून भागविण्यात यावा.

तसेच व्याजापोटी खर्च होणारी रक्कम रु.३१,१९,९४६/-मागणी क्र. सी-१, २०५३ जिल्हा प्रशासन ०९३-जिल्हा आस्थापना (०१)- सर्वसाधारण आस्थापना, (०१) (०३) आयुक्त पुणे (अनिवार्य)◦ (२०५३००६४) या लेखाशिर्षाखाली, १३ कार्यालयीन खर्च◦ या लेखाशिर्षाखाली उपलब्ध असलेल्या अंदाजपत्रकीय तरतूदीमधून खर्ची टाकून भागविण्यात यावा.

०४. सदर शासन ज्ञापन, वित्त विभागाच्या क्र.विअप्र-२०१९/प्र.क्र.२०/२०१९/विनियम, दिनांक ०८/०८/२०१९ रोजीच्या शासन निर्णयान्वये वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८, भाग-२ नुसार महसूल व वन विभागास प्रदान करण्यात आलेल्या वित्तीय शक्तीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन ज्ञापन महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेतांक २०२००८२८१५१४३०१८१९ असा आहे. हे शासन ज्ञापन डिजीटल स्वाक्षरीने सांक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Dinesh Rohidas Chavan

Digitally signed by Dinesh Rohidas Chavan
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Revenue and Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=c0edee7a8805e86e41846cf28cf151b9ce48bb88ebf4f2e8a7fc10e8dcad98ec, serialNumber=8c2377ed235498603821d49922a210871ff6fb9b369722ac707aee7dcd87f2bd, cn=Dinesh Rohidas Chavan
Date: 2020.08.28 15:25:26 +05'30'

**( दि. रो. चव्हाण )**
**अवर सचिव, महसूल व वन विभाग**

*प्रति,*

विभागीय आयुक्त, पुणे विभाग, पुणे.
जिल्हाधिकारी, सातारा.

*प्रत-:*

१) प्रधान महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)१, प्रतिष्ठा भवन,१०१ महर्षि कर्वे भवन, न्यू मरीन लाईन्स, मंबई-४०००२०.
२) प्रधान महालेखापाल (लेखापरीक्षा)-१, प्रतिष्ठा भवन,१०१ महर्षि कर्वे भवन, न्यू मरीन लाईन्स, मंबई-४०००२०.
३) जिल्हा कोषागार अधिकारी, सातारा.
४) वित्त विभाग (व्यय-९/अर्थसंकल्प-३/६/१४ कार्यासने) मंत्रालय, मुंबई-४०००३२.
५) कार्यासन अधिकारी (कार्यासन ब-१), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-४०००३२.
६) निवडनस्ती (कार्यासन “ख”), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-४०००३२.